# सॉलोमन - एक गंजलेला खिळा

कथा आणि चित्रे: विल्यम स्टीग
मराठी : मानसी महाजन



या गोष्टीचा नायक - म्हणजे सॉलोमन हा एक सामान्य ससा आहे.

म्हणजे एक सोडून बहुतेक बाबतीत सामान्य .

नाक खाजवत खाजवत पायाची बोटं हलवली, की सॉलोमन बनतो एक गंजलेला खिळा! परत ससा होण्यासाठी त्याला फक्त स्वतःला आठवण करून द्यावी लागते "मी खिळा नाही आहे, मी आहे एक ससा!" बास.

# सॉलोमन - एक गंजलेला खिळा



कथा आणि चित्रे: विल्यम स्टीग

मराठी : मानसी महाजन

सॉलोमन एक सामान्य ससा होता, म्हणजे एक सोडून इतर सर्व बाबतीत सामान्य - जेव्हा इच्छा होईल, तेव्हा तो गंजलेल्या खिळ्याचे रूप घेऊ शकत असे.
आपल्याला असे करता येते हे त्याला कसे समजले असेल?



एक दिवस घराजवळ बाकावर बसून नुसताच जगाचा विचार करत असताना, सॉलोमनने चुकून एकाच वेळेला नाक खाजवले, आणि पायांची बोटं हलवली.
आणि काय चमत्कार! अचानक तो काहीतरी खरखरीत आणि काहीतरी लहान झाला.

कान नव्हते तरी तो ऐकू शकत होता, डोळे नव्हते तरी तो बघू शकत होता. पण आपले नक्की कशात रूपांतर झाले आहे हे काही त्याला समजत नव्हते. तेवढ्यात त्याची आई साफसफाई करत बाहेर आली. "हा गंजलेला खिळा बाकावर कोणी ठेवला?" असे म्हणत तिने सॉलोमनला उचलून कचरा पेटीत टाकून दिले.



त्याला ओरडावेसे वाटत होते, "अगं आई, मी आहे!" पण तो काहीही आवाज करू शकत नव्हता. साहजिकपणे, त्याला काळजी वाटू लागली. आता काय होणार? या केराबरोबर तोसुद्धा लांब फेकून दिला जाणार का? कायम तिथेच राहणार? काय होणार? "माझी जागा इथे केरात नाही आहे," तो स्वतःशी म्हणाला. "मी खिळा नाही आहे, मी तर ससा आहे!"



असा विचार करताच तो पुन्हा ससा झाला! भांबावलेल्या अवस्थेत तो कचरा पेटीतून बाहेर पडला, आणि घरामागे जाऊन थोडा वेळ नुसता बसून राहिला. आत्ता जे झालं ते खरंच झालं का? हो, झालं. परत करून बघूयात?
त्याने करून पाहिलं, पुन्हा पुन्हा करून पाहिलं, आपल्याला हे कधीही करता येईल अशी खात्री होई पर्यंत करून पाहिलं. एकाच वेळेला नाक खाजवले आणि पायाची बोटं हलवली की सॉलोमन एक गंजलेला खिळा होत असे. "मी खिळा नाही, ससा आहे" असा विचार केला की तो पुन्हा ससा होत असे.



त्याच्या मनात पहिला विचार आला की आधी घरी अजून आपण कसले जबरदस्त ससोबा आहोत हे सर्वांना सांगावे. पण मग त्याने आपले गुपित गुपितच ठेवायचे ठरवले.



रात्री जेवताना आई, बाबा, दोन भाऊ, बहीण सगळे नेहेमीसारखे पालेभाजी आणि गाजरं चरत होते. त्यांच्याबरोबर जेवायला कोण बसला आहे याची त्यांना थोडीतरी कल्पना होती का? अजिबात नाही! सॉलोमन गालातल्या गालात हसला.



रात्री झोपायला गेल्यावर सॉलोमन पांघरुणात शिरला आणि पटकन खिळा झाला. आई त्याला थोपटायला आली तेव्हा तिला बेडवर कोणीच दिसलं नाही! "पिल्लू, कुठे गेलास?" तिने हाक मारली. "इथेच तर आहे! पांघरुणात!" सॉलोमन म्हणाला आणि प्रकट झाला. "काय चाललंय देव जाणे!" खाली जाता जाता आई पुटपुटली.



दुसऱ्या दिवसापासून, सॉलोमन अचानक गायब होऊन आजूबाजूच्या सर्वांना गोंधळून टाकायचा खोडसाळपणा करू लागला. कितीही शोधला तरी तो सापडतंच नसे!



मग अचानक हा खोडसाळ ससा कुठूनतरी प्रकट होऊन, निरागस चेहेरा करून इतरांची मजा बघून हसे.



आजीने सर्वांच्या मनातला गोंधळ बोलून दाखवला, "या मुलाचं काही समजत नाही बुआ! आधी इथे असतो, मग तिथे असतो, आणि मग कुठेच नसतो!"
या गोंधळाचे कारण आपण आहोत याचा सॉलोमनला अभिमान वाटत होता.



पण काहीच दिवसात गायब व्हायच्या गमतीचा सॉलोमनला कंटाळा येऊ लागला. त्याला आता फुलपाखरं गोळा करायचे वेड लागले. लुडो खेळण्यात सुद्धा तो बाबाला हरवू शकेल एवढा पटाईत झाला.



उन्हाळ्याच्या सुट्टीत सॉलोमन असाच एक दिवस फुलपाखरांच्या मागे फिरत होता. तो एक दुर्मिळ फुलपाखरू पकडणार तेवढ्यात त्याच्या मागून कोणीतरी गुरगुरले. "हलू नको! हात वर कर!" सॉलोमन दचकला. त्याच्या हातातून फुलपाखरं पकडायची जाळी आणि डबा खाली पडला. सॉलोमनच्या मागे मोठा चाकू हातात धरलेला एका डोळ्याचा बोका उभा होता. "हात वर ठेव आणि चालू लाग" त्याने फर्मावले.



सॉलोमन मुकाट्याने चालू लागला. चाकूच्या धारेकडे बघताना त्याला जाणवलं की आपलं मरण जवळ आलेलं आहे. मरण? तो बोक्याच्या तावडीतून निसटण्यासाठी धावत सुटला. दुष्ट बोका त्याच्या मागे धावला.



पण असं किती वेळ पाळणार? अरेच्चा! गांजलेल्या खिळ्याची युक्ती केली तर? येईल का ती कामी?

सॉलोमन पटकन एका झाडामागे लपला, त्याने नाक खाजावे, पायांची बोटं हलवली. बोका तिथे धावत पोहोचेपर्यंत सॉलोमन तिथे नव्हताच. तिथे होतं फक्त तुडवलेलं गवत, दगड आणि एक गांजलेला खिळा.



सॉलोमनच्या अश्या गायब होण्यामुळे बोका चक्रावला. झाडाभोवती गोल गोल चकरा मारत तो सॉलोमनला शोधू लागली. शेवटी चक्कर येऊन तो तिथून भेलकांडात निघाला .



"वाचलो!" सॉलोमनने सुस्कारा सोडला, आणि तो पुन्हा ससा झाला. पण त्याने ससा व्हायची जरा घाई केली. बोका जाता जाता मागे वळला, त्याने सॉलोमनला बघितलं आणि एका क्षणात त्याच्या जवळ आला. बिचाऱ्या सॉलोमनला पुन्हा खिळा व्हावं लागलं - तेही बोक्याच्या अगदी पुढ्यात!



"वाह! काय युक्ती आहे!" सॉलोमनला खिशातून घरी घेऊन जाताना बोका म्हणाला.

"हे बघ मला काय सापडलं!" घरात शिरता शिरता बोका ओरडला. "झणझणीत रस्श्यासाठी मस्त गुटगुटीत ससा!" खिशातला खिळा दाखवत बोका म्हणाला.



"*हा* गुटगुटीत ससा आहे?" मांजर चक्रावली. "नक्की का अँब्रोस?"
"हो ग क्लोरिंडा! हा खरा तर ससा आहे, खिळा नाही. थोड्याच वेळात तो त्याच्या खऱ्या रूपात येईल, आणि मग आपल्याला झणझणीत रस्सा खायला मिळेल!"
डोळे फाडून खिळ्याकडे बघणाऱ्या आपल्या बायकोला बोक्यानी सकाळची सगळी हकीकत सांगितली.

शिकार पळून जाऊ नये म्हणून मांजरं शिकार एका पिंजऱ्यात डांबून ठेवत असत. क्लोरिंडाने खिळा पिंजऱ्यात ठेवला, आणि अँब्रोसने पिंजऱ्याला बाहेरून कुलूप लावले. खिळ्यांचा ससा कधी होतो, आणि आपण त्या सशाचा झणझणीत रस्सा कधी करतो याची दोघे वाट बघून लागले.



मांजर आणि बोका आळी पळीने पिंजऱ्यावर पहारा देत होते. त्यांचा विचार काय आहे हे सॉलोमनला पक्कं ठाऊक होतं. या दोन मांजराचं जेवण होण्याची त्याची अजिबात इच्छा नव्हती. जितका वेळ लागेल तितका वेळ खिळाच राहण्याचा सॉलोमनने निश्चय केला.



अँब्रोस आणि क्लोरिंडा लक्ष ठेऊन होते. ते दोघे दुसऱ्या खोलीत घोरू लागले की सॉलोमन हळूच ससा व्हायचा. पिंजऱ्याचे गज वाकवायचा, कुलूप तोडायचा प्रयत्न करायचा. पण काही उपयोग झाला नाही.



तीन आठवडे झाल्यावर  मांजरांना आला कंटाळा. आपल्या नवऱ्याची काहीतरी चूक झाली आहे असा क्लोरिंडाला संशय येऊ लागला.
"अँब्रोस," न राहवून शेवटी ती म्हणाली, "हा खिळा म्हणजे खरा ससा आहे याची तुला अगदी नक्की खात्री आहे ना?"



"मॅडम," अँब्रोस वैतागून म्हणाला, "मी जेवढा खरा बोका आहे, तेवढाच खरा हा ससा आहे!"
"पुरावा काय?" ती म्हणाली.
तिचा अविश्वास बघून अँब्रोसच्या तळपायाची आग मस्तकात गेली. पिंजरा उघडून त्याने खिळा बाहेर काढला आणि तो खेकसला, "मरतुकड्या खिळतुडक्या! तुझी नाटकं बंद कर! ताबडतोब ससा हो!" सॉलोमन काही ससा झाला नाही.

दार उघडून अँब्रोस तावातावाने बाहेर गेला. "देव पावला! आता माझी सुटका होणार!" सॉलोमन आनंदला. "हा मला फेकून देणार असं दिसतंय!" पण कुठे काय!
अँब्रोसने एक हातोडी घेतली आणि - ठाक! ठाक! ठाक! - सॉलोमनला घराच्या भिंतीत ठोकून तो तणतणत घरात निघून गेला.



"आज रात्रीच काहीतरी करायला हवं!" सॉलोमनने विचार केला. मांजरं झोपल्या झोपल्या त्याने "मी ससा आहे" असा विचार केला. पुन्हा पुन्हा विचार केला. पण शरीरात प्राण येतोय असं वाटेपर्यंत तो पुन्हा खिळा होत होता. भिंतीत अडकल्यामुळे त्याला ससा होताच येत नव्हतं!



"हा लाकडी पिंजरा कुजून तुटेपर्यंत मला इथेच अडकून पडावं लागणार का? किती वर्षे? शंभर? तोपर्यंत मी जिवंत तरी असेन का?" त्याला काळजी वाटू लागली होती. "खिळे मारतात का?"



दिवसामागून दिवस चालले होते. वेळ घालवायला सॉलोमन आकडे मोजू लागला - कोटी, दशलक्ष, अब्ज!

कधी कधी समोरचं दृश्य खूप सुंदर दिसे. या जगाचा - लाकडात अडकलेला का असेना - पण आपण एक छोटासा भाग आहोत याबद्दल सॉलोमन ला समाधान वाटे. त्याला घरी जायची खूप इच्छा होई.



आपला मुलगा कुठे गेला हे ठाऊक नसल्यामुळे आई बाबा किती काळजीत असतील! त्यांना आपली किती आठवण येत असेल!
अँब्रोस अनेकदा त्याच्याकडे रागाने, तिरस्काराने बघत असे. पण सॉलोमनला त्याचे तसे बघणे सुद्धा बरे वाटे... त्याचा एकटेपणा थोडा कमी होई.



एक दिवस क्लारिंडाने त्याच्याकडे खूप दयाळू नजरेने पाहिलं. सॉलोमनला रडूच कोसळलं. इतकं चविष्ट जेवण भिंतीत अडकल्याबद्दल तिला वाईट वाटत होतं एवढंच!



एक दिवस अँब्रोस अंगणात काहीतरी खुडबूड करत होता. त्याने सिगारेट शिलगावली आणि पेटती काडी कडेला टाकली. काही समजायच्या आत जमिनीवरच्या वाळक्या पानांनी पेट घेतला आणि ज्वाला घराच्या अगदी जवळ येऊ लागल्या!



अँब्रोस टोपी आपटून आग विझवण्याचा प्रयत्न करत होता. "मी जळाले, मी जळाले!" असं ओरडत क्लारिंडा घराबाहेर धावत आली. दोघे मिळून मदतीसाठी धावले.



ज्वाला सॉलोमनच्या अगदी जवळ पोहोचल्या. त्याला गरम होऊ लागलं. त्याला हलता येत नव्हतं, तरीही त्याला खूप जिवंत, उत्साही आणि तेजस्वी वाटत होतं!



शेजारी पाजारी जमा झाले आणि जवळच्या ओढ्यातून पाण्याच्या बदल्या आणून आग विझवायचा प्रयत्न करू लागले. पण आग कशालाही न जुमानता पेटत राहिली.



आगीने सगळं घर जाळून खाक झालं. थोड्याच वेळात घराच्या जागेवर फक्त धूर, जळकी लाकडं आणि खिळे उरले - ज्यातला एक खिळा होता सॉलोमन! आगीच्या धगीत त्याला खूप उत्साही वाटलं होतं, पण आता सगळ्या मांजरी निघून गेल्यावर तो आनंदाने गार होऊ लागला.



मांजरी गेल्याचं पाहून, त्याने एकदाचे आपले मूळ रूप घेतले! एक खोल श्वास घेऊन त्याने आनंदाने उलटी कोलांटी उडी मारली! आणि उद्या मारत तो लगेच घरी गेला.



सॉलोमनच्या कुटुंबाला त्याचं जाळं आणि डबा सापडला होता. एखाद्या क्रूर प्राण्याने सॉलोमनचा फडशा पडला असणार याची त्यांना खात्री पटली होती.
त्यामुळे समोर प्रत्यक्ष, जिवंत, उड्या मारणाऱ्या सॉलोमनला पाहून त्यांच्या आनंदाला सीमाच राहिली नाही. आश्चर्याच्या किंकाळ्या, आरडा ओरडा झाल्यावर सॉलोमनला जवळ घेऊन त्यांनी त्याचे खूप मुके घेतले.

सगळे थोडे स्थिर-स्थावर झाल्यावर सॉलोमनने त्यांना सगळी गोष्ट सांगितली, आणि आपलं गुपितही सांगितलं. त्यांच्या समोर त्याने खिळा होऊन पुन्हा सॉलोमन होऊन दाखवलं.



सर्वांनी त्याला असं परत न करण्यासाठी बजावलं. फक्त अगदी गरज पडली, तर मात्र कर असं सांगितलं!